महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, मुंबई, या कार्यालयातील १३ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मविन्या-१०१६/प्र.क्र.५९/वि.प्र.४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २८ फेब्रुवारी, २०१७.

वाचा :- (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक मविन्या-१०१६/प्र.क्र.५९/वि.प्र.४, दि. १४.१०.२०१६.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.१०.०२.२०१७

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, मुंबई, या कार्यालयातील १३ अस्थायी पदांना, वित्त विभाग, शासन निर्णय मविन्या-१०१६/प्र.क्र.५९/वि.प्र.४, दि.१४.१०.२०१६ अन्वये दि. २८ फेब्रुवारी २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. न्यायाधिकरणाच्या कामाचे वेगळे स्वरुप (न्यायालयीन कार्यालयासारखे) लक्षात घेता, सदर १३ अस्थायी पदांची कार्यालयास नितांत आवश्यकता असल्याने, या पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, मुंबई, या कार्यालयातील, सोबतच्या विवरणपत्र "अ" मध्ये दर्शविलेल्या, १३ अस्थायी पदांना, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक मविन्या-१०१६/प्र.क्र.५९/वि.प्र.४, दि.१४.१०.२०१६ अन्वये दि. २८ फेब्रुवारी २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. आता सदर पदांना, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ मधील अटींच्या अधीन, दि.१.०३.२०१७ ते दि. ३०.०९. २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. यासंदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०४०, विक्री, व्यापार इत्यादींवरील कर, (०२) महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण , (०२) (०१) महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण (२०४० ००६२) ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२८१२३८२२६४०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraya E Ghanavat

Digitally signed by Dattatraya E Ghanavat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e754dcfc3ad39b1f1ee734fb62ca6c0558ffcae55bba934d42bad451952ab66c, cn=Dattatraya E Ghanavat
Date: 2017.02.28 12:42:59 +05'30'

(द.ए.घनवट)
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

**प्रति,**

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२. महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र, नागपूर,
६. विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१२. प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१३. कार्यासन अधिकारी, प्रशासन-४/वि.प्र.१,२,३,

## विवरणपत्र - अ

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक मविन्या-१०१६/प्र.क्र.५९/वि.प्र.४, दि. २८/०२/२०१७ सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | संवर्गाचे नाव | दि.०१.०३.१७ पासून दि.३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ दिलेली अस्थायी पदे | दि.०१.०३.१७ पासून दि.३०.०९.२०१७ पर्यंत किंवा पाचव्या खंडपीठाच्या व्यवस्थेबाबत पुढील निर्णय होईपर्यंत मुदतवाढ दिलेली अस्थायी पदे |
|---|---|---|---|
| **(अ) राजपत्रित** | | | |
| १ | सदस्य<br>अ) न्यायिक<br>ब) विभागीय | <br>१<br>१ | <br>१<br>१ |
| २ | प्रबंधक | १ | ० |
| ३ | सहाय्यक प्रबंधक | ० | १ |
| | **एकूण राजपत्रित** | **३** | **३** |
| **(ब) अराजपत्रित** | | | |
| ४ | विक्रीकर निरीक्षक | २ | १ |
| ५ | लिपिक-टंकलेखक | ३ | १ |
| | **एकूण अराजपत्रित** | **५** | **२** |
| **महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरणातील एकूण राजपत्रित व अराजपत्रित अस्थायी पदे** | | ८ | **५** |